नवनाथ भक्तिसार    अध्याय दहावा

मच्छिंद्रनाथ तीर्थाटन करीत एका तपाच्या प्रदीर्घ कालावधीनंतर पुनश्च वंग प्रांती आले, त्यालाही कांही सबळ कारण होते. बारा वर्षांपूर्वी येथील चंद्रगिरी नगरीतील एका निपुत्रिक विप्र स्त्रीला सूर्यतेजाचा अंश असलेले भस्म खावयास दिले होते आणि तुला महा पराक्रमी पुत्र होईल असा आशीर्वाद दिला होता पण त्या स्त्रीने दुसऱ्याचे ऐकून त्या भस्माला उकिरड्यात फेकले आणि अनर्थ झाला. त्या विप्र स्त्रीला या घटनेचा विसर पडला पण नाथांना मात्र स्मरण होते. नाथांनी त्या स्त्रीची निर्भत्सना केली आणि ते भस्म नेमके कुठे भिरकवलेस ती जागा तरी दाखव अशी विचारणा केली. तिने गोवऱ्या साठविण्यासाठीचा कोनाडा दाखविला. नाथांनी "हरी नारायणा! तू तिथे असल्यास तर बाहेर ये. गौवऱ्यांच्या राखेत तू अस्तित्वास आलास आणि राहिलास म्हणून मी तुझे नाव 'गोरख' असे ठेवत आहे. गोरक्ष बाहेर ये." असा पुकारा केल्यावर त्या गौवऱ्यांच्या ढिगाऱ्यातून बारा वर्षांचा तेजपुंज सुकुमार बाहेर आला. नाथांनी केलेल्या या चमत्काराने तेथील रहिवासी स्तिमित झाले. गोरक्षाने कनकगिरी गावात आपल्या गुरुभक्ती व गुरुश्रद्धे वरील निष्ठेचे दर्शन घडवले; असो!

नाथ गोरक्षास घेऊन तीर्थाटनास निघाले. मार्गात कनकगिरी गावात गोरक्षाने प्रसंगोपात आपली श्रद्धा गुरुनिष्ठा, आज्ञापालनाच्या आचरणाकडे नाथांचे लक्ष्य वेधले. ब्राह्मणाच्या घरी पुनश्च भिक्षा मागण्या करिता गेला असता तेथील विप्रस्त्रीने मस्करीत भिक्षेच्या बदल्यात डोळा मागितला असता गोरक्षाने त्वरित स्वतःच्या बोटाने स्वतःचाच डोळा काढून तिला दिला. गोरक्षाच्या ह्या निष्ठेवर प्रसन्न होऊन नाथांनी त्यांस सर्व विद्यांनी पारंगत करण्याचे ठरविले. नाथांनी गोरक्षाला चौदा विद्या आणि चौसष्ट कलांमध्ये पारंगत केले.

श्री दत्तगुरुंकडून मिळालेले ज्ञान मच्छिंद्रनाथांनी गोरक्षाला दिले. रसायनशास्त्र, काव्यशास्त्र, वेदशास्त्र, ज्योतिष्यशास्त्र, व्याकरणशास्त्र, धनुर्विद्या, जलतरण, संगीतशास्त्र, अश्वारोहण, कोकशास्त्र, नाट्यशास्त्र इत्यादींसह चौदा विद्यांत गोरक्षास पारंगत केले.

"विश्व आणि विश्वंबर हे अभिन्न आहेत. सर्व चराचरात एकच ब्रह्मचैतन्य भरून राहिले आहे. जो कुणी या चैतन्यमयी ईश्वरास जाणतो, त्याचे कर्म, अकर्म, विकर्म, सत्कर्म लोप पावतात. वासनेला योगरूपी दोरखंडाने बद्ध केले की मनुष्य त्या शक्तीचाच एक भाग बनतो" अशा प्रकारे ब्रह्मोपदेश करीत गोरक्षाला बुद्धिवंत केले. वात, पित, कफनिवारक रसायनशास्त्राचा अभ्यास करवून घेतला. धातू रसायनामधील धातूंचे प्रकार रचना, उपयोग, लोहारकाम, ओतकाम, पत्रा कारागिरी इत्यादी बाबतीतही सखोल माहिती, उपुक्तता यांचे सखोल ज्ञान दिले. काव्याशास्त्रातील नवरसांची महती, रस्व, दीर्घ अक्षरासंबंधी माहिती, गण, अर्थ, लिंगभेदातील रचनात्मक बारकावे, अलंकार, छंद, इत्यादी प्रकार शिकवले ऋग्वेद, अथर्ववेद, यजुर्वेद, सामवेद या चार वेदांतील सूक्ते, ऋचा यांचा गूढ मतितार्थ समजावून सांगितला. ज्योतिष्यशास्त्राच्या माध्यमांतून गृह, तारे, नक्षत्रे यांची रचना, भ्रमणकाळ, तिथी, वार इत्यादींचा अभ्यास करवून घेतला आणि भूत भविष्य जाण्याची विद्या शिकवली. सिद्धांत कौमुदी हा व्याकरण शास्त्रावरील ग्रंथ, रघुवंश, किरातार्जुनीयम, शिशुपालवधम, मेघदुतम ही पंचकाव्ये आणि वेदांत, न्याय, योग, सांख्य, वैशेषिक, मीमांसा, सहा शास्त्र करवून घेतला.

याशिवाय धनुर्विद्येमध्ये गोरक्षास निष्णांत केले. धनुर्विद्येच्या माध्यमातून वापरली जाणारी अस्त्रविद्या शिकवली. जलदास्त्र, पर्जन्यास्त्र, उर्मी उभी अस्त्र म्हणजे उड्या मारायला आणि उभे राहण्यासाठी, अर्थात आज्ञा देणाऱ्याकडून आज्ञानार्थीला दिला जाणारा आदेश, कामास्त्र, वाताकर्षण, अस्त्र, पर्वतास्त्र, विराक्तास्त्र, देवास्त्र, दानवास्त्र, पवनास्त्र, कालास्त्र, स्तवानास्त्र, कार्तीकास्त्र, स्पर्शास्त्र, विभक्तास्त्र, ब्रह्मास्त्र, अशा प्रकारच्या असंख्य अस्त्रांबरोबरच शाबरी विद्या शिकवली. या नंतर नाथांनी सर्व देवदेवतांना पाचारण करून गोरक्षाला आशीर्वाद मिळवून दिला. सर्व दैवते प्रसन्न झाली. त्यांनी मच्छिंद्रनाथांस सुचविले की, गोरक्षाला तपला बसवावे, तपश्चर्ये शिवाय ज्ञानाला परिपक्वता येत नाही. ज्ञानरुपी शास्त्राला तपश्चर्येची धार लावली तर महासंग्राम सहज जिंकता येतात.

मंत्रजप, अनुष्ठान, स्वाध्याय आणि परमेश्वर स्मरण यांत काळ व्यतीत होत होता, एक दिवस गुरुमहाराजांच्या आज्ञेनुसार गोरक्ष संजीवनी जपजाप्य करीत होता. ठराविक जपसंख्या पूर्ण करावयाची होती त्याला जपला बसवून नाथ बाहेर गेले होते. गावामधली मुले खेळत बागडत त्याच्या जवळ आली, चिखलाचा गोळा त्याला देत म्हणली, “अरे गोरख! बघ आम्ही हा चिखल आणला आहे. आम्हाला त्याची गाडी बनवून दे.”

गोराक्षांने त्यांना टाळण्यासाठी उत्तर दिले, “गड्यांनो! मला नाही रे बनवता येणार.” मग त्या मुलांनी कशी तरी गाडी बनवली. त्यानंतर त्याच्यातल्याच एकाला कल्पना सुचली की, गाडी चालविण्यासाठी गाडीवान असावा. त्यांनी गाडीवानाची बाहुली बनविण्याचा प्रयत्न केला परंतु त्यांना काही तो आकार घडविता येईना. मुले पुन्हा गोराक्षकडे येऊन विनंती करू लागली. “अरे गोरख! निदान गाडीवान तरी बनवून देना!! थोडी तरी मदत कर आम्हाला, आमच्यामध्ये तू वयाने मोठा आहेस. आम्हाला खेळण्यासाठी एक गाडीवान करून देच!” मुलांची गयावया पाहून गोरक्ष म्हणला, “ठीक आहे! चिखलाचा गोळा द्या माझ्याकडे.” असं म्हणाला आणि त्या चिखलाच्या गोळयास आकार देऊ लागला. हे करीत असतांनाच संजीवनी पाठ चालूच होता. त्या मंत्रप्रभावाने चिखलाच्या बहुल्यात विष्णूवीर्य संचारून पंचमहाभूते सक्रीय झाली आणि चैतन्य सजीवत्व निर्माण झाले. चिखलाच्याऐवजी मनुष्य देहधारी बालक दिसू लागले. ते रडू लागले हे पाहून सर्व मुलं भयभीत होऊन पळापळी करू लागले. थरथरत, आरडाओरडा करीत पळत आहेत परतणाऱ्या मच्छिंद्रनाथांनी पहिले. त्यांनी पळणाऱ्या मुलांपैकी दोघांना बळे बळे अडवून विचारले, “बाळांनो! ही पळापळी का बरे? एवढे घाबरायला काय झाले? घाबरू नका मला सांगा काय घडलं ते?

अतिशय भयभीत अवस्थेतल्या त्या मुलांनी सांगितले की चिखलाच्या लगद्यातून गाडीवान बहुला साकारण्याची कसब गोरक्ष करीत असतांना, त्या बाहुल्याचे मानवी देहात रुपांतर झाले. ते भूतबाळ रडत आहे आता ते लहानंग आहे पण काही वेळात आक्राळ विक्राळ रूप धारण करील आणि आम्हाला खाईल, या भीतीने आम्ही पळत आहोत. आतापर्यंत त्याने गोरक्षालाही खाल्ले असेल. तुम्ही सुद्धा पळा, थांबू नका. भूत! भूत! असा आरडाओरडा करू लागले.

नाथ विचारात पडले. मुले एवढी भयभीत का झाली आहेत? ही काय भानगड असावी? अचानक भूत कसे आले? मुलांना धीर देत ते म्हणाले, “बाळांनो! मी तुमच्या सोबत असतांना घाबरायचे कारण नाही. कोणत्या ठिकाणी भूत निघाले आहे ते मला दाखवा. चला! आपण त्या भुतालाच शिक्षा करू या.”

मुले म्हणाली, “आपणसुद्धा तिकडे जाऊ नका, येथून पाळणे हाच जीव वाचविण्याचा मार्ग आहे. एकूणच ते भूत महा तेजस्वी वाटते आहे. पळा! पळा इथून!

नाथांनी त्या मुलांना कसे बसे सावरले. आपल्या समवेत कुणी एक वडीलधारी व्यक्ती आहे यामुळे त्यांच्यामध्येही धीर आला. "अरे मुलांनो! थांबा जरा आणि मला दुरून तरी त्याचा ठाव ठिकाणा दाखवा!' असा नाथांनी आग्रह केल्यामुळे त्या मुलांनी दुरूनच ते स्थान दाखवले आणि दूर अंतरावर जाऊन थांबले.

गोरक्षसुद्धा त्या ठिकाणाहून पसार झाला होता. चिखलाच्या लगद्याला गाडीवानाचा आकार देत असताना आकस्मिकपणे मानवदेहधारी बालकात परिवर्तन झाल्याचे पाहून गोरक्षसुद्धा घाबरला होता. ते बाळ रडायला लागल्याबरोबर त्याने त्याला तिथेच टाकले आणि जोरदार उडी मारून 'भूत भूत...' असा ओरडा करीत सर्वांच्या पुढे पळाला. एका अडगळीच्या जागी थरथरत लपून राहिला. भयाने पांढरा फटक पडलेला गोरक्ष आपल्यामागून भूत येणारच असे गृहीत धरूनच सगळीकडे नजर फिरवीत होता.

मच्छिंद्रनाथ त्या जागेवर गेल्यावर, त्यांना कचऱ्यात पडलेले सुंदर सुस्वरूप बालक दिसले. रुदन करीत असलेल्या बाळाला पाहताच त्यांनी, 'हा करभजन आहे' हे ओळखले. त्यांनी तत्परतेने त्या बाळाला उचलून हृदयाशी धरले. ते पाहून दूरवरच्या मुलांच्या घोळक्यातून, "अरे पळा, पळा. गुरुबाबांनी त्या भुताला आणले आहे. त्याला सोडले तर आपल्या मागे लागून एकेकाचा फडशा पाडणार, पळा आता!" असे म्हणत मुले पळू लागली. पडता पडता धडपडू लागली. भयाने आपआपल्या घरात जाऊन लपून बसली. नाथ मात्र त्या लहानग्याला उरी कवटाळून गोरक्षाला शोधत परिसरात फिरत होते. प्रत्येक घराजवळ जाऊन गोरक्षाला हाका मारीत होते. नाथांचा हाकारा ऐकताच घरांत लपून बसलेली मुले भेदरून ओरडू लागली, "भूत आले!! भूत आले!!" प्रत्येक घरी नुसता कोलाहल उठला होता. घराघरातील गावकरी नाथांना विचारू लागले, "अहो महाराज! मुलांना उगाच का घाबरता? मुले का आरडा ओरडा करीत आहेत? कशाचे भय त्यांना दाखवत आहेत? आणि तुमच्या हातात हे कुणाचे बाळ आहे ते सांगा?"

नाथ म्हणाले, "प्रथम गोरक्षाला शोधतोय? तो कुठे आहे ते सांगा, तो एकदा भेटला की सर्व खुलासा करतो."

गोरक्ष ज्या ठिकाणी लपला होता त्या ठिकाणी नाथ पोहोचले गोरक्षा! गोरक्षा!! अशी हाक कानी पडताच, विशेषतः गुरुजींचा आवाज कानी पडताच भयभीत झालेला गोरक्ष बाहेर आला आणि नाथांच्या हातांत बाळ पाहताच आरडाओरड करीत आंत पाळला. नाथांना समजून चुकले की इतर भयचकित झालेल्या मुलांप्रमाणे हा सुद्धा या बाळाला भूत समजतोय. मग त्यांनी स्वतःच्या डोईवरील मुंडासे काढून जमिनीवर अंथरले आणि त्यावर बाळाला निजवले. गोराक्षाजवळ जाऊन डोळ्यांवरील त्याचे हात बाजूला केले आणि म्हणाले, "बाबारे! ते भूत नाहीय, घाबरू नकोस! अरे, तो करभजन नारायण बाळरूपांत अवतारला आहे. आता काय प्रकार घडला तो मला सविस्तर सांग." गोरक्षाने जे काही घडले ते सविस्तर सांगितले परंतु मनातली भीती मात्र कायम होती.

नाठींनी विचारले, "पुतळा बनविताना संजीवनी मंत्राचे पठण बंद केले होतेस का?" गोरक्ष नाथांच्या ह्या प्रश्नावर अधिकच घाबरला आणि म्हणाला "नाही महाराज! मंत्रपठण अखंडपणे चालू होते. खेळतानासुद्धा जप थांबविला नव्हता. मला शिक्षा करू नका गुरुदेव! मी आपली आज्ञा मोडली नाहीय"

गोरक्षाची ही कैफियत ऐकून मच्छिंद्रनाथांना खूप आनंद झाला ते म्हणाले, "वत्सा! तू योग्य तेच केले आहेस." नाथांनी त्याला धीर देण्यासाठी त्याला कुरवळले आणि म्हणाले, "उठ आता! बाहेर चल" बाहेर जाण्याच्या विचारानेच गोरक्ष

भेदरला आणि म्हणाला, “गुरुजी! आपण जे भूत आणले आहे ते माझ्या मांडीवरच प्रकटले ते मला खाल्ल्याशिवाय सोडणार नाही. माझ्यावर द्या करा. मला बाहेर नेऊ नका.” बाहेर जाण्याचे धाडस त्याच्याकडून होत नव्हते.

नाथ म्हणाले, “अरे गोरक्षा! ते बाळ म्हणजे भूत नाही, तू संजीवनी मंत्र म्हणत होतास ना? त्याच्या प्रभावाने त्या चिखलाच्या मूर्तीचे मानवी देहांत रुपांतर झाले. त्या बाळात भुताची कोणतीही लक्षणे नाहीत.”

“म्हणजे ते भूत नाही तर? गोरक्षाने विचारले.

“नाही रे! भीती सोडून दे, मी आहे ना तुझ्याबरोबर.” गुरुजींचे विश्वासाचे बोलणे ऐकून तो बाहेर आला. तरीसुद्धा सावधपणा म्हणून पुन्हा पुन्हा तो त्या चिखलाच्या बाहुलीतून मानवी देहात परिवर्तन झालेल्या बाळाकडे पाहून स्वतःची खात्री करून घेत होता. नाथांनी त्या बाळाला आणि गोरक्षाला आपल्या पर्णकुटीत आणले. गाईचे दुध मागवून त्या बाळास पाजले. वस्त्रांचाच पाळणा केला. त्यात बाळाला झोपवून महान तपाचरणी मच्छिंद्रनाथ अंगाई गात झोके देत होते.

दरम्यानच्या कालावधीत त्या परिसरात ही नवलाईची गोष्ट इतरांनाही समजली. वावड्या उठू लागल्या. उत्सुकता वाढल्यामुळे गावकरी नाथांच्या पर्णकुटीजवळ जमा झाले. नाथांचे दर्शन घेउन त्यांनी विचारले, “योगीमहाराज! हे बाळ कुणाचे आहे?” त्यांना वस्तुस्थिती कळावी म्हणून नाथांनी सर्व इत्यंभूत वृतांत त्यांना सांगितला. ते ऐकून लोक थक्कच झाले. एकमेकांना सांगू लागले की हा तपस्वी योगी शुक्राचार्यांपेक्षाही श्रेष्ठ का समजू नये? शुक्राचार्य मृतदेहाला सजीव करतो पण याने तर निर्जीव चिखलाचा सजीव देह निर्माण केला. हा साधासुधा तपस्वी नसून साक्षात सृष्ठीनिर्माता ब्रहमदेवच म्हणावा लागेल. ब्रम्हदेव सुद्धा बीजापासून किंवा स्वशारीरापासून उत्पत्ती करतो परंतु नाथांनी तर बालक शिष्याकरवी मानव निर्माण केला. धन्य धन्य हया गुरुशिष्यांची! अशी चर्चा, स्तुती, चौकशी करीत हे गावकरी नाथांजवळ बसले होते. अशावेळीच ही जमलेली मंडळी म्हणाली, “योगी महाराज! आपण महान आहात हे खरे, पण बाळाचे पालनपोषण करणे हे आपल्यासारख्या संन्याशांच्या क्षमतेबाहेरचे काम आहे. हे काम फक्त स्त्रीच करू शकते, माताच करू शकते, पुरुषाचे ते क्षेत्र नाही. तेव्हा या बाळाला कोणा एका धर्माच्या मातेकडे सोपवणेच इष्ट होईल. त्या रास्त विचारावर सर्वांचेच एकमत झाले. नाथ म्हणाले, “सज्जन हो! आपण योग्य तेच बोलत आहात. माता हीच सर्वश्रेष्ठ आणि महान आहे, त्रिखंडात वंदनीय आहे पण या बालकासाठी धर्माची आई शोधायची कुठे?

गावकऱ्यांनी विचार विनिमय करून गावामधल्याच मधु नावाचा ब्रहामण आणि त्याची पत्नी गंगाबाई यांचे नाव सुचाविले. या उभयतांना संतानसुख नव्हते. तिच्या ओटीत बाळ सुपूर्द करण्याचे ठरले. त्याचक्षणी मधुभट आणि गंगाबीईला बोलाविण्यात आले. मच्छिंद्रनाथांनी दृष्ठीक्षेपातच ओळखले की, ही सद्‌गुणी साध्वी असून बाळाचे संगोपन ममतेने करील. परिसरातील समस्त रहिवासीसुद्धा या उभयतांविषयी चांगले बोलतात म्हणजे नक्कीच हे पतीपत्नी गुणवंत असून उत्तम योग दिसून येत आहे. नाथांनी गंगाबाईच्या ओटीत त्या बाळाला घातले आणि म्हणाले, “गंगामाई! हा दैवी बालक आहे. नवनारायणांमधला करभजनांचा अवतार आहे. याचे पालनपोषण केल्याने तुझा जन्म सार्थकी लागेल. दिगंत कीर्तीच्या पुत्राची माता म्हणून तू ओळखली जाशील. जसा देवकीचा श्रीकृष्ण, तसा तुझा हा बाळ उदंड कीर्तिमान होईल. साक्षात कैलासवासी श्रीशंकर निवृत्ती या नावाने अवतार घेऊन याचे शिष्य होऊन सेवा करतील.

हा त्यांचा गुरु होईल. चिखलापासून याची उत्पत्ती झाली म्हणून याचे नाव 'गहिनी' असे ठेव. आम्ही तीर्थाटनसाठी जाणार आहोत. बारा वर्षांनी माझा शिष्य गोरक्ष येथे परत येऊन याला सानुग्रह सज्ञान कारील. याचा सांभाळ कर!"

विप्रपत्नी गंगा म्हणाली, "महाराज! बारा वर्षांनी परत येऊन आपण माझ्यापासून बाळाची ताटातूट कराल आणि मला पुत्रहीन करून दुःखी कराल. मग माझ्या त्यागाचे, ममतेचे काय सार्थक होणार? मी तर बारा वर्षांपूरती भाडोत्री माता ठरेन, तरी आताच काय तो प्रांजळ खुलासा करा!"

नाथांनी प्रांजळपणे उत्तर दिले, "माई! हा बाळ तुझ्या ओटीत घातला आहे, आता तो तुझाच झाला आहे. आम्ही गाय वासराची ताटातूट करणार नाही. तू त्याची माता हा तुझा पुत्र हेच त्रिकाळ सत्य समज. मी किंवा माझा शिष्य या बाळास तुझ्यापासून कधीही हिरावून नेणार नाही, हे स्पष्ट अभिवचन मी देत आहे. बारा वर्षांचा कालावधी संपल्यावर माझा शिष्य गोरक्ष याला अनुग्रह देऊन सज्ञान करील. मग हा तीर्थयात्रा करील. याचा सांभाळ कर. हा चिरंजीव आहे." असे म्हणून नाथांनी गंगाबाईवर मोहनास्त्र टाकून दुध उत्पन्न केले. तिने बाळाला पदरात घेऊन दुग्धपान करविले. गावातील सुवासिनींनी बाळाला पाळण्यात घालून त्यांचे बरसे केले आणि 'गहिनी' असे नामकरण केले.

काही दिवसांच्या वास्तव्यानंतर मच्छिंद्रनाथ आणि गोरक्ष यांनी तीर्थाटनासाठी तेथून आपला मुक्काम हलविला आणि भ्रमंतीसाठी निघाले. भ्रमंतीमार्गात नाथांनी गोरक्षाच्या वेगवेगळया कसोट्या घेऊन चांचपणी केली असतां त्यांना जाणवले की तपोबलाच्या अभावाने गोरक्षाला परिपक्वता आली नाही. म्हणून गोरक्षाला तपाचरणासाठी बसविण्यासाठी त्यांनी बद्रिकाश्रमाच्या रोखाने वाटचाल सुरु केली.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने स्त्री दोष नाहीसे होऊन संतती वाचेल.